**मौजे मलकापूर, जि. बुलढाणा येथील चाळीसबिघा परिसरातील नगरपरिषद प्राथमिक शाळा क्र.४ ची जागा "मलकापूर शिक्षण समिती" मलकापूर यांना हस्तांतरीत करण्याबाबत..............................**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमयुएन-२०१६/प्र.क्र.२९८/नवि-१८,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - १७.१२.२०१६.

**वाचा :-** १) जिल्हाधिकारी बुलढाणा यांचे क्र.न.वि.शा./डे-५/सी.आर.१२०/२००७, दि.१०.०६.२०१६.
२) मलकापूर नगरपरिषदेच्या सर्वसाधारण सभेचा ठराव क्रमांक ४६, दि.०४.०५.२०१६.

**प्रस्तावना :-**

मौजे मलकापूर येथील चाळीसबिघा परिसरात टी.पी.स्कीम नं.१, भूखंड क्र.२४८ वर १.६६ हेक्टर आर या जागेवर नगरपरिषद प्राथमिक मराठी शाळा क्र.४ आहे. या शाळेची पटसंख्या ११ आहे. पटसंख्या कमी असल्यामुळे तसेच शाळेची इमारत शिकस्त असल्यामुळे आज रोजीस या शाळेतील विद्यार्थी नगरपरिषदेच्या शाळा क्र.६ येथील वर्ग खोल्यांमध्ये बसून शिक्षण घेत आहेत. या विद्यार्थ्यांचे समायोजन त्या शाळेत होवू शकत असल्यामुळे मलकापूर शिक्षण समितीद्वारा संचलित हिराबाई संचेती कन्या शाळा व सरस्वती प्राथमिक कन्या शाळा या दोन शाळांना शहरातील चाळीस बिघा परिसरातील डॉ.अरविंद कोलते हॉस्पीटल समोरील शैक्षणिक कामासाठी राखीव जागा अपुरी पडत असल्याने शिक्षण समितीच्या कार्यवाह यांनी नगरपरिषदेला शिकस्त झालेल्या नगरपरिषद शाळा क्र.४ ची जागा कायमस्वरुपी मागीतली आहे.

सदरची जागा मलकापूर शिक्षण समितीस हस्तांतरीत करण्याबाबत मलकापूर नगरपरिषदेच्या महासभेने ठराव क्रमांक ४६, दिनांक ४.५.२०१६ अन्वये एकूण परिषद बहूसंख्येने पारीत केला आहे. त्यानुसार जिल्हाधिकारी बुलढाणा यांनी त्यांच्या दिनांक १०.०६.२०१६ च्या पत्रान्वये मौजे मलकापूर येथील चाळीसबिघा परिसरातील नगरपरिषद प्राथमिक मराठी शाळा क्र.४ ची जागा "मलकापूर शिक्षण समिती मलकापूर" यांना हस्तांतरीत करण्याबाबतचा प्रस्ताव महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगीक नगरी अधिनियम १९६५ च्या कलम ९२ नुसार शासनाकडे पाठविला आहे. यासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेतील नमुद वस्तूस्थिती विचारात घेता, मौजे मलकापूर येथील चाळीसबिघा परिसरात टी.पी.स्कीम नं.१, भूखंड क्र.२४८ वर १.६६ हेक्टर (१०६६० चौ.मी) ही मलकापूर नगरपरिषदेच्या

मालकीची जागा "मलकापूर शिक्षण समिती मलकापूर" या संस्थेस १० वर्षासाठी हस्तांतरीत करण्यास पुढील अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) महाराष्ट्र नगरपालिका (स्थावर मालमत्तेचे हस्तांतरण) नियम १९८३ मधील तरतूदीनुसार त्रिसदस्यीय समितीमार्फत भाडेनिश्चिती/अधिमुल्याची रक्कम ठरविणे आवश्यक राहील. मात्र असे करताना महाराष्ट्र नगरपालिका (स्थावर मालमत्तेचे हस्तांतरण) नियम १९८३ मधील तरतूदींचे पालन करणे संबंधित संस्थेवर बंधनकारक राहील.

२) सदर जागेचा वापर हा संबंधित संस्थेने ज्या प्रयोजनासाठी जागा भाडेपट्टयाने देण्यात आली आहे त्याच प्रयोजनासाठी वापरणे आवश्यक राहील.

३) सदर जागेचा वापर वाणिज्यिक प्रयोजनासाठी करता येणार नाही.

४) सदरची जागा हस्तांतरण कामी मुख्याधिकारी नगरपरिषद मलकापूर व संबंधित संस्था यांच्यामध्ये तसा करारनामा होणे आवश्यक राहील.

५) शासनाने मान्य केलेल्या अटीनुसार सदरची जागा हस्तांतरणाचा कालावधी संपल्यानंतर शासन मान्यतेशिवाय हस्तांतरणाचा कालावधी वाढविता येणार नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१२१७१४०६३८२४२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anish Raman Parshurame

Digitally signed by Anish Raman Parshurame
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5ec58fef33f1b3244a3957d134f915dcb444ab4953880ff670e5eca3d7a9f53b, cn=Anish Raman Parshurame
Date: 2016.12.17 14:09:55 +05'30'

**( अनिष परशुरामे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय, वरळी, मुंबई.
२) जिल्हाधिकारी, बुलढाणा.
३) मुख्याधिकारी, मलकापूर, जि.बुलढाणा.
४) अध्यक्ष, नगरपरिषद मलकापूर, जि.बुलढाणा.
५) अध्यक्ष, मलकापूर शिक्षण समिती, मलकापूर, जि.बुलढाणा.

**प्रत,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव (नवि २) यांचे वि.का.अ., नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) निवड नस्ती, कार्यासन नवि - १८.